२७०२ आदिवासी उपाय योजनेअंतर्गत (T- ५) ल.पा.तलाव पठावे, ता.बागलाण जि.नाशिक(साखळी क्र.५०मी. ते १६८५ मी.पर्यंत कालवादुरुस्ती) अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेंबाबत

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/(१९१ /२०१४)/सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १२ .९.२०१४

**पहा :-**

**संदर्भ १)कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र जा क्र /गोमपाविम /तां.५/ २३०४ /सन २०१४ दिनांक ६.३.२०१४**

**प्रस्तावना**

पठावे ल.पा. तलाव बागलाण तालुक्यातील आदिवासी क्षेत्रात येतो. तलावाची साठवण क्षमता ६१.४० दलघफू. असून सिंचन क्षेत्र ३४८ हे. आहे. यामुळे पठावे, भोरकुरे सावरगांव, तळवाडे इं. गावांना लाभ होतो. तलावाचा डावा कालवा ७.८० कि.मी असून हा कालवा वहन क्षमता ६ क्युसेक्स इतकी आहे. सदरचा कालवा टेकडीच्या कडेने वळणा-वळणाने गेल्यामुळे उताराच्या बाजूने झिरपा होवून पाणी पुढे जात नाही. पाणी झिरपल्यामुळे शेतक-यांचे पिकांचे नुकसान होत असल्याने शेतकरी कालवा बंद पाडण्यास भाग पाडतात व त्यामुळे कालव्याच्या पुढील भागास पाणी न मिळाल्यामुळे सिंचन होवू शकत नाही. झिरपा होत असलेल्या ठिकाणी कालव्यात पाईप टाकून, सिमेंटचे लायनींग करण्याचे प्रस्तावित केलेले आहे. विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाचे विचारधीन होते.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे पठावे लघु पाटबंधारे तलाव ता. बागलाण जि. नाशिक च्या दुरुस्ती कामास रु ५६.४३ (रु ५१.३०लक्ष कामानिमित्त व रु ५.१३लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे..
१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२)सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.
३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्तेतीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (mile stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार mile stones साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) विशेष दुरुस्तीची जी कामे यांत्रिकी संघटनेकडून करुन घेणे शक्य आहेत ती यांत्रिकी संघटनेकडून करण्यात यावीत.

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

६) दरसूची बाहय बाबीचे दर सक्षम स्तरावर मंजूरी घेवून तांत्रिक मान्यता प्रस्ताव मंजुर करण्यात यावा.

या कामावर होणारा खर्च या कामावर होणारा खर्च २७०२ लघु पाटबंधारे पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०१ भुपृष्ठ जल -७९६ जनजाति क्षेत्र उपाययोजना (०१) जनजाति क्षेत्र उपाययोजनेतंर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) स्वेच्छाधीन अनुदानित (विस्तार व सुधारणा) (२७०२ ३६९३) ३१ ए सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या मुख्य लेखाशिर्षखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ६१ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१५१२५४४२८६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2014.09.15 12:51:34 +05'30'

( सं.अ.टाटू )
**शासनाचे उप सचिव**

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/(१९१ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक १२ .९.२०१४चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| अ.क्र | कामांचे नांव | अंदाजीत किंमत लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कामाप्रित्यर्थ | ५१.३० |
| | अनुषंगिक खर्च- १० टक्के | ५.१३ |
| | **एकूण** | **५६.४३** |

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2014.09.15 12:52:16 +05'30'

(सं.अ.टाटू)
शासनाचे उप सचिव